**गर्गा मध्यम प्रकल्प अंतर्गत, मौजे तातरा, ता. धारणी, जि. अमरावती या गावाचे कलम १०८ अंतर्गत वाजवी नुकसान भरपाईचे (ऐच्छिक पुनर्वसन) प्रस्तावास विशेष बाब म्हणून मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - आरपीए-१०१६/प्र.क्र.१०५/र-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :-१५ जून, २०१७

**वाचा-** विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र. उपआ/पुनर्व/अका/कावि-१८८/२०१६, दिनांक १/२/२०१६.

**प्रस्तावना-**

गर्गा मध्यम प्रकल्प , ता. धारणी, जि. अमरावती हा अतिदुर्गम आदिवासी बहूल भागातील प्रकल्प असून मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांच्या सिंचन अनशेष कार्यक्रमांतर्गत समाविष्ट आहे. सदर प्रकल्पाच्या जलाशयामध्ये तातरा गांव अंशत: बाधित होत असून एकूण ६९ घरे बाधित क्षेत्रामध्ये येत आहेत. तातरा गांवाच्या अंशत: पुनर्वसनाकरिता ७.०६ हे. खाजगी जमिनीच्या संपादनाची प्रक्रिया (PESA) कायद्यानुसार फारच किचकट व गुंतागुंतीचे असल्यामुळे भुसंपादनाची कार्यवाही करणे शक्य झाले नाही. याबाबत दि. १७.८.२०१५ रोजी झालेल्या सभेमध्ये बाधित कुटूंबांनी पुनर्वसनाऐवजी वाजवी नुकसान भरपाईचे प्रस्तावास लेखी सहमती दर्शविली आहे. गर्गा मध्यम प्रकल्प ता. धारणी, जि. अमरावती या प्रकल्पाला दि. १४.११.२००८ रोजी रू. १४०.२४ कोटी (दरसूची २००८-२००९) या किमतीस प्रशासकिय मान्यता देण्यात आली आहे. या प्रकल्पामुळे ४२८१ हेक्टर जमीन सिंचनाखाली येणार आहे. सदर जलाशयामध्ये अंशत: बाधित गावांचे कलम १०८ अंतर्गत वाजवी नुकसान भरपाईचे (ऐच्छिक पुनर्वसन) प्रस्तावास कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र दि. २.९.२०१५ नुसार तत्वत: मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे.

विभागीय आयुक्त, अमरावती यांनी दिनांक ०१.०२.२०१६ च्या पत्रान्वये मौजे तातरा या गावाचे कलम १०८ अंतर्गत वाजवी नुकसान भरपाईचे (ऐच्छिक पुनर्वसन) प्रस्तावास विशेष बाब म्हणून मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला असून सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या प्रस्तावावर शासनाकडून पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद वस्तुस्थिती विचारात घेऊन गर्गा मध्यम प्रकल्प अंतर्गत, मौजे तातरा, या गावाचे भूमीसंपादन, पूनर्वसन व पुनर्वसाहत करताना उचित भरपाई मिळण्याचा आणि पारदर्शकतेचा हक्क अधिनियम, २०१३ (२०१३ चा ३०) च्या कलम १०८ अंतर्गत वाजवी नुकसान भरपाईचे (ऐच्छिक पुनर्वसन) प्रस्तावास **विशेष बाब** म्हणून या आदेशाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर आदेश जलसंपदा विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६१५१७१७१५८३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shivaji P Karwar

Digitally signed by Shivaji P Karwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=46ec07554eac404147684ed8b27adc8a1c2a78fe8ffea3c9dd01377e25f76a36, cn=Shivaji P Karwar
Date: 2017.06.15 17:16:08 +05'30'

(शि. पां. कारवार)
कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती
३. जिल्हाधिकारी, अमरावती
४. सदस्य सचिव, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
५. अधिक्षक अभियंता, उर्ध्व वर्धा प्रकल्प मंडळ, अमरावती
६. कार्यकारी अभियंता, अमरावती पाटबंधारे विभाग, अमरावती
७. जिल्हा पुनर्वसन अधिकारी, अमरावती
८. निवडनस्ती, कार्यासन र-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.